राज्यातील निरिक्षणगृहे, बालगृहे,
अनाथालयांमधील प्रशासकीय कामकाजाबाबत

2UDH0719160217001-25W

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
परिपत्रक क्र. निरिगृ-२०००/ प्र.क्र.१५२/का-३
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक -२८ ऑगस्ट २०००.

वाचा - शासन परिपत्रक महिला व बाल विकास विभाग क्र. संकीर्ण-१०९८/ प्र.क्र. ७९/ का-३, दि. २३.२.१९९८.

परिपत्रक - राज्यातील निरिक्षणगृहे, बालगृहे व अनाथालयांना उच्च न्यायालयाच्या आदेशान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीने भेटी दिल्या. या भेटीवेळी या गृहांमध्ये कामकाज पध्दतीत काही त्रुटी दिसून आल्या. या त्रुटींचे निराकरण करुन त्याची पुनरावृत्ती होऊ नये याची सर्व संस्थांच्या अधिक्षकांनी व पर्यवेक्षिकीय अधिका-यांनी काळजी घेणे आवश्यक आहे. शासन या परिपत्रकान्वये या गृहांच्या कार्यपध्दतीत सुधारणा होण्यासाठी खालीलप्रमाणे सुधारित सुचना निर्गमित करीत आहे. त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१. सर्व अधिक्षकांनी निरिक्षणगृह , बालगृह इ.मध्ये स्वच्छता गृहे व स्नानगृहे तातडीने दुरुस्त करुन घ्यावीत व ती स्वच्छ ठेवणेबाबत कार्यवाही करावी.

२. स्वयंपाक घरामध्ये अन्न शिजविण्याकरीता ज्या ठिकाणी उपलब्ध होईल तेथे स्वयंपाकाचा गॅस उपलब्ध करुन द्यावा व पुरविण्यात येणारे अन्न पोषक असेल याची काळजी संस्थेच्या अधिक्षकांनी घ्यावी.

३. संस्थेमध्ये दाखल झालेल्या मुलांना कमीत कमी दोन शाळेचे गणवेश / दोन इतर पोषाख दरवर्षी देण्यात येतील याची संस्थेच्या अधिक्षकांनी खातरजमा करावी

४. संस्थेमधील प्रवेशितांनी काही काम करुन जर काही कमाई केली असल्यास त्याबाबत बाल न्याय नियम १९८९ मधील नियम २३ येथील तरतुदीनुसार संस्थेच्या अधिक्षकांनी कार्यवाही करावी.

५. संस्थेमध्ये दाखल करण्यात आलेला प्रवेशितांची वैद्यकिय तपासणी तो / ती संस्थेत दाखल झाल्यपासून ४८ तासाच्या आत करण्यात यावी. ही जबाबदारी संस्थेतील एका कर्मचा-याकडे सोपवावी आवश्यक तेथे पोलिसांचे सहाय्य घ्यावे. ज्यांना साथीचे रोग झाले आहेत असे निदर्शनास येईल त्यांची निवासाची संस्थेमध्ये स्वतंत्र व्यवस्था करण्यात यावी. त्यांना तात्काळ वैद्यकिय उपचार सुरु करण्यात यावे अथवा त्यांना शासकीय रुग्णालयात उपचारासाठी दाखल करण्यात यावे.

६. संस्थेमधील वेशिताचा नैसर्गिक/ आकस्मिक मृत्यू झाल्यास अथवा तो संस्थेतून पळून गेल्यास अशा प्रकरणी ब न्याय अधिनियम १९८६ मधील तरतुदीनुसार संबधित अधिक्षकांनी तात्काळ कार्यवाही करावी. ज अशी काळजी घेण्यात आली नाही असे आढळून आले तर संबंधित दोषी कर्मचा-याविरुध्द तात्काळ माप्रमाणे सक्षम अधिका-यानी शिस्तभंगविषयक कारवाई करावी.

७. ज्या अंध मूकबधीर, अपंग व मतिमंद मुलांना विशेष जपणूक करण्याची आवश्यकता असते. हे लक्षात घे त्यांना त्यांचेसाठी स्थापन केलेल्या स्वतंत्र संस्थांमध्ये पाठविण्यात यावेत.

८. बालगृह, क्षणगृह, अनाथालये इ. संस्थाना शासनाकडून परिरक्षणाकरीता जे अनुदान दिले जाते ते प्रवेशितांच अन्न, वस्त्र व इतर आवश्यक गरजा भागविण्याकरीताच खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यावी.

९. एकाच नि ण बालगृहामध्ये काही प्रवेशित सहा वर्षापेक्षा जास्त कालावधीकरीता ठेवण्यात येऊ नये. बाल , निरिक्षणगृहामध्ये ज्या प्रवेशितांवर लैंगिक अत्याचार झालेले आहेत अशा प्रकरणी बाल न्याय अधिनिय तील व भारतीय दंड विधान संहितेतील तरतुदीनुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी. अशा प्रकरणी बालकास बाल कल्याण मंडळ / बाल न्यायालयाच्या आदेशानुसार तात्काळ अन्य संस्थेत हस्तांतरीत करा व या प्रकरणी प्रशासकीय कायदेशीर कारवाई पूर्ण करावी.

१०. काळजीव कांनी कर्तव्य करताना केलेल्या गैरवर्तनाबाबत त्यांचेवर अस्तित्वात असलेल्या नियमानुसार शिस्तभंग षयक कारवाई तात्काळ करण्यात यावी. खाजगी संस्थाचे बाबत संस्थांनी अशी कार्यवाही केली ना तर आयुक्तांनी संस्थेस दिलेला परवाना रद्द करणेबाबत कार्यवाही करावी.

११. ाल क ण मंडळावरील सदस्यांचे तथा कर्तव्ये समुपदेशकांचे आणि समाजसेविकांचे मानधन अधिक्षव निरिक्षणगृह जिल्हा महिला बाल कल्याण अधिकारी यांना नियमित अदा करावे.

१२. अधिक्षव निरिक्षणगृह यांनी बाल कल्याण मंडळास आवश्यक कर्मचारी वृंद, दूरध्वनी, टायपिंग मशीन व स्टेशन इ. उपलब्ध करुन द्यावे. मंडळाला पुरेशी जागा उपलब्ध करुन द्यावी.

१३. निरिक्षण , बालगृह तथा अनाथालये इ. संस्थांमध्ये भेटी देण्यासाठी सामाजिक क्षेत्रात काम करणा-या व्यक्तिंच बाल न्याय अधिनियम १९८६ च्या कलम ५४ मधील तरतुदीनुसार ज्याच्या नेमणूका करण्या आल्या असतील त्यांनी संस्थांना महिन्यातून एकदा भेट देणे त्यांचेवर बंधनकारक राहील तसेच नी तीन महिन्यातून एकदा आपल्या भेटीबाबतचा अहवाल राज्यस्तरीय समितीला सादर करावा.

१४. संस्थांम ल मुलांना आधुनिक व्यावसायिक प्रशिक्षण / शिक्षण देण्यासाठी राज्यातील रोटरी क्लब शिक्षक पलब्ध करुन देण्यास तयार आहेत. याशिवाय मुलांकरीता टुथब्रश, अंतवस्त्रे, चपला / बूट,

छत्री इ. साहित्य रोटरी क्लबकडून उपलब्ध होऊ शकेल याकरीता संस्थांना पुढील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा. पत्ता श्री. एस.जी.कपाडीया, १३५, ग्रेट वेस्टर्न बिल्डींग, दुसरा मजला, २३ , मेडो स्ट्रीट, फोर्ट, मुंबई २३.

१५. संस्थांमधील मुलांना शिक्षण वा व्यावसायिक शिक्षण संस्थेमध्ये उपलब्ध नसेल तर त्यांना संस्थेबाहेर या सुविधा उपलब्ध करुन द्याव्यात व त्याकरीता त्यांना आवश्यक तो प्रवासाचा खर्च देण्यात यावा. हा खर्च संबंधित संस्थेने करावा. त्याबाबत आवश्यक तेथे आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची परवानगी घ्यावी.

१६. संस्थेमधील मुलांना दर महिन्यातून एकदा संस्थेबाहेर जवळच्या ऐतिहासिक / रम्य ठिकाणी सहलीला नेण्यात यावे. याबाबतही रोटरी क्लबकडून सहकार्य घ्यावे.

१७. संस्थेमध्ये वार्षिक सांस्कृतिक कार्यक्रम तथा खेळांचे आयोजन करण्यात यावेत.

१८. शासनाने संस्थेतील काळजीवाहक व इतर कर्मचा-यांचे प्रशिक्षण आयोजित करावे. असे प्रशिक्षण जर टाटा सामाजिक विज्ञान संस्था, रोटरी क्लब, युनिसेफने आयोजित केल्यास या प्रशिक्षणाला संस्थेतील कर्मचा-यांना न चुकता पाठवावे.

१९. जे प्रवेशित आर्थिक हलाखीच्या परिस्थितीमुळे अथवा परिक्षेत नापास झाल्यामुळे संस्थेमध्ये दाखल केले असतील त्यांचेबाबत संस्थेने राज्य स्तरावरील समितीकडे आपल्या शिफारशी पाठवाव्यात.

२०. राज्यस्तरीय समितीने प्रवेशितांना एका संस्थेतून दुस-या संस्थेत पाठवितांना जी सुरक्षा व्यवस्था पुरविण्यात येते त्यामध्ये येणा-या अडचणींबाबत विचार विनिमय करुन त्याबाबत शिफारशी राज्य शासनास सादर करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(राजेंद्र पवार)
कक्ष अधिकारी

ति,

ायुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.

र्व जिल्हाधिकारी,

ल्हा महिला व बाल विकास अधिकारी,

वड नस्ती, का-३.

C:\MY\Dictation Yogita.doc